**<u>श्री. मिलींद व्हटकर</u>**
**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उप अभियंता (यां) पदावरील तदर्थ नियुक्ती पुढे चालू ठेवण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः याचिका २०१४/प्र.क्र.२११/पापु-१५**
गो. ते. रूग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: १८ फेब्रुवारी, २०१५

**<u>वाचा :-</u>**

१) **शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. आपना-२०१३/प्र.क्र.२४९/पापु -१५, दि. ३१/७/२०१४.**
२) **मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर यांचे ओ. अे. क्रमांक ३७७/२०१४ वरील दिनांक १९/१२/२०१४ चे आदेश.**

**<u>प्रस्तावना :-</u>**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उप अभियंता (यां) ही पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार ५०:५० याप्रमाणे नामनिर्देशनाने व पदोन्नतीने भरण्यांत येतात. नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदे रिक्त असल्याने व शासकीय कामकाज पार पाडण्यासाठी रिक्त असलेली पदे भरण्याच्या हेतूने शाखा अभियंत्यांना तदर्थ स्वरुपात उप अभियंता (यां) पदावर सन २००८ पासून पदोन्नत्या देण्यात आल्या आहेत. सदर तदर्थ स्वरुपातील पदोन्नत्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा ११ महिन्याच्या कालावधी पर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत देण्यात आल्या होत्या. सदर तदर्थ पदोन्नत्या वेळोवेळी खंड देऊन पुढे चालू ठेवण्यांत आल्या होत्या.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदांवर १६ उमेदवारांच्या शिफारशी प्राप्त झाल्यानंतर त्यातील १५ उमेदवारांच्या नियुक्त्या तदर्थ स्वरुपात कार्यरत असलेल्या अभियंत्यांना शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन शासन निर्णय, दिनांक ३१/७/२०१४ अन्वये करण्यांत आल्या आहेत. श्री.मिलिंद वसंत व्हटकर, यांनी त्यांच्या पदावनतीच्या आदेशाविरोधात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे मूळ अर्ज क्र. ५७३/२०१४, दाखल केला होता.श्री. मिलिंद वसंत व्हटकर यांनी दाखल केलेल्या मूळ अर्जांवर मा.न्यायाधिकरणासमोर सुनावणी होऊन त्यावर मा.न्यायाधिकरणाने शासनाचे दिनांक ३१/७/२०१४ रोजीचे आदेश रद्दबातल

ठरविले आहेत. मा.न्यायाधिकरणाचे दिनांक १९/१२/२०१४ रोजीचे आदेश विचारात घेऊन श्री.मिलिंद वसंत व्हटकर यांची उप अभियंता (यां), या पदावरील तदर्थ पदोन्नती पुढे चालू ठेवण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री. मिलिंद वसंत व्हटकर यांनी न्यायाधिकरणासमोर दाखल केलेल्या मूळ अर्जांवर मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेल्या आदेशानुसार श्री. मिलिंद वसंत व्हटकर यांच्या शाखा अभियंता या पदावरील पदावनतीचे आदेश याद्वारे रद्द करण्यांत येत आहेत. मा.न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार श्री. मिलिंद वसंत व्हटकर यांची उप अभियंता (यां) या पदावरील तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा सदर पद नियमितरित्या भरण्यात येईपर्यंत किंवा ११ महिन्याच्या कालावधीपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत पुढे चालू ठेवण्यांत येत आहे. श्री.व्हटकर यांना खालील प्रमाणे पदस्थापना देण्यांत येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री. मिलींद वसंत व्हटकर | ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग येथील उप अभियंता (यां) या पदावर |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१६१७११०१९१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.02.18 12:00:49 +05'30'

**( प्रमोद गि. कानडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे

२) उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर/ कोकण

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर / सिंधुदुर्ग

४) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर / सिंधुदुर्ग

५) श्री. मिलींद वसंत व्हटकर, उप अभियंता (यां) (संचालनालयामार्फत)

६) निवड नस्ती (पापु-१५)